**राज्यातील आदिवासी क्षेत्रातील विद्युतीकरणासाठी लागणा-या पायाभुत सुविधांतर्गत पालघर जिल्हयातील जव्हार-४ येथील १३२ केव्ही उपकेंद्र उभारण्यासाठी आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीत करण्याबाबत. (लेखाशिर्ष २८०१ ५०८९ )**

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६ / प्र.क्र.२४ / कार्यासन.६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - ३१ मार्च, २०१७.

वाचा -

१) वि. वि. शासन परिपत्रक क्र.अर्थसं- २०१६ / प्र. क्र.८९ / अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१६ /प्र.क्र.३१ /कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६.
३) वि. वि, शासन परिपत्रक क्र. पूरक -२०१६ / प्र.क्र. २०१ / अर्थसंकल्प-३, दि.०४.०१.२०१७.
४) उद्योग,उर्जा व कामगार विभाग,नस्ती क्र. आंवियो- २०१६ /प्र. क्र.१०/ ऊर्जा -३.

**शासन निर्णय -**

राज्यातील आदिवासी क्षेत्रातील विद्युतीकरणासाठी लागणा-या पायाभुत सुविधांतर्गत पालघर जिल्हयातील जव्हार-४ येथील १३२ केव्ही उपकेंद्र उभारण्यासाठी आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता वित्त विभागाने पुरवणी मागणी अंतर्गत् मागणी क्र.टी-५, २८०१, वीज, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ८०- सर्वसाधारण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०३) महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादीत यांना अनुदान ( २८०१ ५०८९ ) या लेखाशिर्षाखाली रु.६६७.४८ लाख इतका निधी अर्थसंकल्पित केला आहे.

वित्त विभागाने वाचा क्र. ४ येथील प्रस्तावास दिलेल्या मंजूरीच्या अधीन राहून राज्यातील आदिवासी क्षेत्रातील विद्युतीकरणासाठी लागणा-या पायाभुत सुविधांतर्गत पालघर जिल्हयातील जव्हार-४ येथील १३२ केव्ही उपकेंद्र उभारण्यासाठी आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता वित्त विभागाने पुरवणी मागणी अंतर्गत् मागणी क्र.टी-५, २८०१, वीज, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ८०- सर्वसाधारण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०३) महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादीत यांना अनुदान (२८०१ ५०८९ ) ३५- भांडवली मत्ता निर्मितीसाठी सहायक अनुदान या लेखाशिर्षाखाली सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत **रु.५३३.९८ लाख ( रुपये पाच कोटी तेहतीस लाख अठ्याण्णव हजार फक्त )** इतका निधी नियंत्रक अधिकारी, प्रधान सचिव, ( उर्जा ) उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**२.** उपरोक्त वितरीत केलेला निधी या प्रकल्पाच्या मंजूर प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेत करण्याची तसेच त्यानुषंगाने निधी खर्च करण्यासंबंधीच्या नियमांचे पालन करण्याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

३. सदर वितरीत निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BEAMS) खर्चासाठी नियंत्रक अधिकारी यांना सुपूर्द करण्यात येत आहे. सदर निधी वेळोवेळी निर्गमित सूचनांनुसार व वित्त विभागाच्या वित्तीय नियमानुसार खर्च करण्याची दक्षता नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

४. उपरोक्त आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं- २०१६ / प्र. क्र.८९ / अर्थ-३, दि.२०.०४.२०१६ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१६ /प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८३ / अर्थ-१९, दिनांक ३०-०३-२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३१११५३२००४२४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.31 14:46:43 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव

**प्रत,**

१. प्रधान सचिव ( उर्जा ),उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे /नाशिक / अमरावती / नागपूर.
४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा ) /(लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
६. वित्त विभाग ( अर्थ-१९ ) / ( व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
७. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.